**<u>नोंदणी व मुद्रांक विभाग</u>**
**श्री.एम.एल.पुरळकर, सह दुय्यम निबंधक वर्ग-२ यांची बदली...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१६/२२०१/प्र.क्र.६३९/म-१**
दालन क्र.म-७ अ, पोटमाळा, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार इमारत), मुंबई-४०० ०३२.
तारीख: १८ ऑक्टोबर, २०१६.

**<u>संदर्भ:-</u>** महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र.बदली-२०१६/प्र.क्र.३६८/म-१, दि.३१.०५.२०१६.

**<u>शासन आदेश:-</u>**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) नुसार संदर्भाधिन आदेशान्वये श्री.एम.एल.पुरळकर सह दुय्यम निबंधक वर्ग-२ यांना बोरीवली क्र.१० येथे पदस्थापना देण्यात आली होती. परंतु, सह दुय्यम निबंधक वर्ग-२, बोरीवली क्र.१० हे कार्यालय सद्य:स्थितीत कार्यान्वित नसल्याने श्री.पुरळकर हे सदर कार्यालयात रुजू शकले नाहीत. त्यामुळे त्यांना पदस्थापना देणे आवश्यक असल्याने संदर्भाधिन आदेश या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहेत. आता महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) नुसार प्रशासकीय कारणास्तव सह दुय्यम निबंधक वर्ग-२/सह जिल्हा निबंधक वर्ग-२ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली करण्यास सक्षम प्राधिकरणाच्या पूर्वमान्यतेने श्री.एम.एल.पुरळकर यांची खालीलप्रमाणे बदलीने नियुक्ती करण्यांत येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याचे कार्यालय | बदलीने नियुक्तीचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १. | श्री.एम.एल. पुरळकर, सह दुय्यम निबंधक वर्ग-२ | पदनिर्देशित सह दुय्यम निबंधक वर्ग-२, बोरीवली क्र.१० | सह दुय्यम निबंधक वर्ग-२, कुर्ला क्र.३ (मुंबई उपनगर जिल्हा) या ठिकाणी श्री.मिस्त्री यांच्या दि.३१ ऑक्टोबर, २०१६ रोजी सेवानिवृत्तीने होणाऱ्या रिक्त पदावर. |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधित अधिकाऱ्यास तात्काळ कार्यमुक्त करुन सदर आदेश तात्काळ अंमलात येतील असे पहावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१४५३२८४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pritamkumar Vasantrao Jawale

Digitally signed by Pritamkumar Vasantrao Jawale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pritamkumar Vasantrao Jawale
Date: 2016.10.27 14:56:46 +05'30'

**( प्रितमकुमार जावळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे

**प्रत,**

१. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३. नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक, मुंबई
४. सह जिल्हा निबंधक वर्ग-१, कुर्ला, मुंबई उपनगर जिल्हा
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई
७. निवडनस्ती (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.